*निवडणूक प्राधान्य*

लोकसभा सार्वत्रिक निवडणुका २००४
निवडणूक आयोगाच्या आचार संहितेचे पालन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक : सीईएल—३८०४/३३/का—१,
मंत्रालय, मुंबई—४०० ०३२.
दिनांक : १ मार्च, २००४.

## परिपत्रक

भारत निवडणूक आयोगाने दिनांक २९ फेब्रुवारी, २००४ रोजी लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणुका घेण्याचा कार्यक्रम जाहीर केला आहे. निवडणूक आयोगाने विहित केलेल्या आदेशानुसार निवडणुका जाहीर झालेल्या दिनांकापासून ते निवडणूक प्रक्रिया पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीसाठी पाळावयाची आचारसंहिता निवडणूक आयोगाने प्रसिध्द केलेल्या कॉम्पोडियम ऑफ इन्स्ट्रक्शन्स ऑन कॉण्डक्ट ऑफ इलेक्शन पार्ट—I अॅण्ड II (१९९८ आवृत्ती) पुस्तकांत देण्यात आली आहे. ही पुस्तके व निवडणुकांच्या संदर्भात निवडणूक आयोगाने वेळोवेळी काढलेले इतर आदेश यांच्या प्रती सर्व मंत्रालयीन विभागाच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिवांकडे मुख्य निवडणूक अधिकाऱ्यांनी पूर्वी पाठविलेल्या आहेत. त्यामधील काही महत्वाचे आदेश आपल्या निदर्शनास खालीलप्रमाणे आणण्यात येत आहेत :—

(१) शासकीय वाहनांचा वापर :— निवडणुकीच्या कालावधीत निवडणूक प्रचारार्थ निवडणूक कार्यासाठी अथवा निवडणुकीशी संबंधित दौऱ्यासाठी मंत्री, राज्यमंत्री, राजकीय पक्षाचे उमेदवार , इत्यादी व्यक्तींनी शासकीय वाहनांचा वापर करण्यावर पूर्ण बंदी घातली आहे. ''शासकीय वाहन'' या संज्ञेमध्ये राज्य व केंद्र शासनाच्या नियंत्रणाखालील सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, मंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था, वैधानिक मंडळे, महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हा परिषदा, सहकारी संस्था अथवा ज्यामध्ये सार्वजनिक निधी गुंतविला आहे अशा कोणत्याही संस्थांच्या परिवहनासाठी वापरात येणाऱ्या वाहनांचा समावेश आहे. सदर वाहनांपैकी निवडणुकीसाठी आवश्यक असलेली वाहने हयांचे अधिग्रहण लोकप्रतिनिधीत्व कायदा १९५१ च्या कलम १६० नुसार करण्यात यावे. इतर वाहने संबंधित कार्यालयाच्या प्रशासकीय प्रमुखाच्या ताब्यात राहतील व सदर वाहनांचा निवडणूक प्रचारा विषयक कामासाठी वापर होणार नाही हयाची सर्वस्वी जबाबदारी ही त्या कार्यालयाच्या प्रशासकीय प्रमुखाची राहील.

आयोग आणखी असा निदेश देत आहे की, निवडणुकीची तारीख जाहीर झाल्यापासून ते निवडणुका पूर्ण होईपर्यंत, वर नमूद केलेल्या वाहनांचा, एखाद्या उमेदवाराकरिता किंवा उमेदवाराकडून निवडणूक विषयक कामासाठी गैरवापर होतो किंवा कसे यावर जिल्हा प्रशासनाने बारकाईने लक्ष ठेवावे. केंद्र शासनाच्या किंवा



y-3461—1

राज्य शासनाच्या वर नमूद केलेल्या एखाद्या वाहनाचा तसेच, सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांच्या किंवा स्थानिक संस्थांच्या वाहनाचा, निवडणूक विषयक कामासाठी गैरवापर होत असल्याचे आढळून आल्यास, जिल्हा दंडाधिकाऱ्याने ताबडतोब असे वाहन योग्य ती कार्यवाही करुन अधिकाऱ्यांना लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ चे कलम १६० याखालील निवडणूकविषयक आपली कर्तव्ये पार पाडण्याकरिता त्याचा वापर करता यावा म्हणून अधिग्रहित करावे किंवा तशी व्यवस्था करावी. अशा रीतीने अधिग्रहीत केलेली वाहने, निवडणुकीची संपूर्ण प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत सोडण्यात येऊ नये. तसेच निवडणुकीची आचारसंहिता लागू झाल्यापासून म्हणजे दिनांक २९ फेब्रुवारी, २००४ पासून मंत्री/राज्यमंत्री/खासदार व आमदार महोदयांनी दौऱ्याचे वेळे रेल्वे आरक्षणासाठी देण्यात आलेली रेल्वे प्रवासासाठीची एच.ओ.आर.सुविधा अथवा तत्सम अन्य सुविधाही वापरता येणार नाहीत.

मंत्र्यांना/राज्यमंत्र्यांना त्यांच्या मुख्यालयातील त्यांची शासकीय वाहने शासकीय कामासाठी त्यांच्या निवासस्थानापासून कार्यालयापर्यंत जाण्यासाठी वापरण्याचा हक्क राहील. मात्र अशा कामाबरोबर निवडणुकीचे कोणतेही काम किंवा राजकीय काम करता कामा नये असे स्पष्ट करण्यात येत आहे.

(२) शासकीय विश्रामगृहांचा वापर :— शासकीय विश्रामगृहे, डाकबंगले किंवा इतर शासकीय निवास व्यवस्था यावर फक्त सत्ताधारी पक्षांचा किंवा त्यांच्या उमेदवारांचाच हक्क असू शकणार नाही आणि अशा निवास व्यवस्थेचा वापर इतर पक्षांना व उमेदवारांनाही न्याय्य पध्दतीने करुन देता येईल. मात्र कोणत्याही पक्षाला किंवा उमेदवाराला अशी निवास व्यवस्था (तीत संलग्न असलेल्या जागेसह) निवडणूक मोहिमेच्या कार्यालयासाठी किंवा निवडणूक प्रचाराच्या कामासाठी, सार्वजनिक सभा घेण्याच्या प्रयोजनासाठी वापरता येणार नाही. अशाप्रकारे विश्रामगृहे इत्यादींचे मर्यादित वाटप प्रचाराच्या संपूर्ण कालावधीत करता येईल. तथापि, कोणत्याही विशिष्ट क्षेत्रात मतदान संपुष्टात येण्याच्या आधी ४८ तासापासून ते मतदान अथवा फेरमतदान पूर्ण होईपर्यंतच्या कालावधीत असे वाटप थांबविण्यात येईल. असे भारत निवडणूक आयोगाने त्यांच्या दिनांक २० जानेवारी, १९९८ च्या पत्रान्वये कळविले आहे. (प्रत सोबत जोडली आहे.)

(३) मंत्री, राज्यमंत्री महोदयांचा व्यक्तीगत कर्मचारीवृंद :— निवडणुकीच्या कालावधीत मंत्री, राज्यमंत्री यांना त्यांच्या कर्मचारीवृंदाच्या सेवा पक्षाच्या अथवा निवडणुकीच्या कामासाठी वापरता येणार नाहीत. तसेच अशा कर्मचाऱ्यांना निवडणूक आयोगाचे आदेश क्रमांक ४३७/६/९६/पी.एल.एन/तीन, दिनांक १७ जानेवारी, १९९६ यांचे अधीन राहून दौऱ्यावरही नेता येणार नाही.

(४) सुरक्षा व्यवस्था :— मंत्री, राज्यमंत्री व अन्य मान्यवर आदींसाठी देण्यात आलेली सुरक्षा व्यवस्था निवडणूक आयोगाचे आदेश क्रमांक : ४३७/६/९४, दिनांक ८ मे, १९९४ व क्रमांक ४३७/६/९४/२४०७, दिनांक १४ मे, १९९४ अन्वये ज्यांना संरक्षण दिले आहे, त्यांच्या बाबतीत पुढे चालू राहील.

(५) राजशिष्टाचार :— निवडणुकीच्या कालावधीत राज्याला भेट देणाऱ्या केंद्रातील वा अन्य राज्यातील अधिकाऱ्यांना सध्या अस्तित्वात असलेली राजशिष्टाचार व्यवस्था चालू ठेवावी, परतु अशासकीय अतिथींसाठी ही राजशिष्टाचार विषयक सुविधा देता येणार नाही. याबाबतचे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या राजशिष्टाचार कक्षाने सर्व राज्य सरकारांना कळविले आहेत.

(६) मालमत्ता विरुपित ( Defacement ) करण्यास प्रतिबंध :— भारत निवडणूक आयोगाने मालमत्ता विरुपित करण्यास प्रतिबंध करण्यासंबंधी दिलेल्या आदेशांचे/सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

वर काही महत्वाचे आदेश उदाहरणादाखल संक्षेपाने नमूद केले असून, सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी निवडणूक आयोगाने प्रसिध्द केलेल्या सर्व आदेशांचे पालन होत आहे किंवा नाही, हे पाहण्याची जबाबदारी शासनाच्या सर्व अधिकाऱ्यांची तसेच त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांची व्यक्तिश: राहील. मंत्रालयीन विभागांच्यासर्व सचिवांनी हे आदेश त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख तसेचत्यांच्या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील महामंडळे, सार्वजनिक उपक्रम, इत्यादींच्या निदर्शनास आणून त्या संदर्भात कार्यवाही करावी.

या आदेशांच्या संदर्भात काही शंका असतील तर त्यांचे निराकरण करण्यासाठी जिल्हा निवडणूक अधिकारी किंवा श्री.आर.के.भार्गव, मुख्य निवडणूक अधिकारी, मंत्रालय यांचेशी संपर्क साधावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

अ. गं. निंबाळकर

( अजित निंबाळकर )
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपाल यांचे सचिव,
२. मुख्य मंत्री यांचे सचिव,
३. उप मुख्य मंत्री यांचे सचिव,
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
६. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
७. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई,
८. *प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
९. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
१०.सर्व विभागीय आयुक्त,
११.पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२.सर्व महानगरपालिका आयुक्त,
१३.सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी,
१४.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५.सर्व नगरपालिका/नगरपरिषदांचे मुख्य अधिकारी,
१६.सर्व मंत्रालयीन विभागांखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

*पत्राने.